सामाजिक विकासाच्या योजना प्रत्यक्षात कार्यान्वित होण्यासाठी व त्यांची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी व त्यामध्ये समन्वय घडवून आणण्यासाठी एक विशेष कक्ष (सेल) व त्यासाठी पदे निर्माण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:आस्थापना-२००३/प्र.क्र.७/२००३/११-अ,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ११ सप्टेंबर, २००३.**

**शासन निर्णय :-**

राज्य शासनाचा वर्ष २००३-२००४ करिता सामाजिक न्यायाच्या संकल्पनेवर आधारित अर्थसंकल्प सादर करण्यात आलेला होता. अर्थसंकल्पात विविध विभागांच्या ब-याच नवीन संकल्पना अंतर्भूत करण्यात आल्या होत्या. सामाजिक जबाबदारी अधिनियम, सामाजिक निर्देशांक इत्यादींच्या अनुषंगाने ब-याच योजनांचा अंतर्भाव अर्थसंकल्पात झालेला होता. या सर्व नवीन योजनांची व्यवस्थित बांधणी करुन त्यांना विनाविलंब अंमलात आणण्याची गरज तसेच मागासवर्गीयांसाठी सामाजिक क्षेत्रातील योजना राबविण्याकरीता विविध स्तरावर निर्णय घेण्याकरीता संबंधीत विभागांमध्ये समन्वय साधण्याची आवश्यकता आहे.

राज्य शासनाची नवीन अर्थसंकल्पातील संकल्पना अंमलात आणण्यासाठी शासनाने विविध स्तरांवर शक्ती प्रदान समित्यांचे गठन केलेले आहे. विभागीय तसेच जिल्हास्तरावरील समित्यांचे नियंत्रण करण्यासाठी व निरनिराळया योजनांच्या संदर्भात सर्व विभागांशी समन्वय साधून मागासवर्गीयांसाठीच्या विकास योजनांची अंमलबजावणी प्रभावीपणे करण्यासाठी एक विशेष कक्ष निर्माण करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत सर्वंकष विचार करुन अपर मुख्य सचिव (सामाजिक विकास समन्वय) यांच्या अधिपत्याखालील नवीन विशेष कक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या (खुद्दच्या) आस्थापनेवर स्थापन करण्यास व त्याकरिता खाली दर्शविल्याप्रमाणे पदे निर्माण करण्यास व त्यासाठी येणा-या वार्षिक रु.५४.३० लक्ष इतक्या खर्चास शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदाची संख्या |
|---|---|---|---|
| | | | |
| १ | अपर मुख्य सचिव (सामाजिक विकास समन्वय) | २६००० अधिक भत्ते | १ |
| २ | उप सचिव | १२०००-१६५०० | १ |
| ३ | अवर सचिव | १००००-१५२०० | १ |
| ४ | कक्ष अधिकारी | ६५००-१०५०० | २ |
| ५ | सहायक | ५५००-९००० | ४ |
| ६ | निवडश्रेणी लघुलेखक | ७४५०-११५०० | १ |
| ७ | लघुलेखक (उच्चश्रेणी) | ६५००-१०५०० | २ |
| ८ | लघुलेखक (निम्नश्रेणी) | ५५००-९००० | १ |
| ९ | लिपिक-टंकलेखक | ३०५०-४५९० | ३ |
| १० | शिपाई | २५५०-३२०० | ४ |
| ११ | वाहनचालक | ३०५०-४५९० | २ |
| | एकूण | | २२ |

(कृ.मा.प.)

२. उपरोक्त पदांच्या वेतन व भत्यावरील खर्च "२०५२-सचिवालय सर्वसाधारण सेवा (०९०)सचिवालय-(००) (०१) सामान्य प्रशासन विभाग ०१ वेतन - संगणक संकेतांक २०५२००२५-मागणी क्र.ए-४" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६६२/०३/विसू-१, दि.३१.७.२००३ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( शैला तारगे-पाटील )
सह सचिव (आस्थापना),
सामान्य प्रशासन विभाग.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव / अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
आयुक्त, समाजकल्याण, पुणे,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
आयुक्त, सेवायोजन, मुंबई,
सहाय्यक आयुक्त (मागासवर्ग कक्ष), सर्व विभागीय आयुक्तांची कार्यालये,
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील कार्या.क्र.१६-ब / १९ / २२ / २४ / २५ /२६,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

* पत्राने